**राज्य योजना सन २०१५-१६ निसर्ग पर्यटन योजने अंतर्गत चालू बाब प्रस्ताव.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०६१५/प्र.क्र.१७०/फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०००३२.

दिनांक :- ०३ ऑगस्ट, २०१५.

वाचा :-

१. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.४१ (भाग-२)/१५-१६/३०७ दिनांक २९.०५.२०१५.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.४१ (भाग-२)/१५-१६/८१९ दिनांक २७.०७.२०१५.
३. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७.०४.२०१५.

**प्रस्तावना :-**

सन २०१५-१६ राज्यस्तरीय योजनेतंर्गत निसर्ग पर्यटन योजना (२४०६ २२९५) या लेखाशिर्षांतर्गत रुपये ५१००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर असून त्यापैकी रु. ३५७०.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर योजनेतील रु. २०००.०० लक्ष इतका नियतव्यय संरक्षित क्षेत्राकरिता मंजूर करण्यात आला असून त्यापैकी रु. १४००.०० लक्ष निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सबब, अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार, सन २०१५-१६ करीता योजनेअंतर्गत निसर्ग पर्यटन योजना (२४०६ २२९५) मधील विहीत प्रयोजनाखाली अर्थसंकल्पित निधीच्या ७० % मर्यादेत निधी माहे नोव्हेंबर, २०१५ पर्यत खर्च करण्यास " **अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनांतर्गत जुन्या योजनांचा खर्च - योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्यास वित्त विभागाबरोबर नियोजन विभागाचीही सहमती आवश्यक नाही "** या अटीवर खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

तथापि संदर्भ क्रमांक १ च्या पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावात रु. ६०८.५० लक्ष पैकी रु. १३१.५८ लक्ष इतका निधी महाराष्ट्र राज्य निसर्ग पर्यटन विकास मंडळाची स्थापनेसाठी प्रस्तावित करण्यात आला आहे. निसर्ग पर्यटन योजनेत महाराष्ट्र राज्य निसर्ग पर्यटन विकास मंडळाची स्थापना या कार्यबाबीचा समावेश केल्यास योजनेच्या स्वरुपात / व्याप्तीत बदल होत आहे. सदर बदलास नियोजन व वित्त विभागाची मान्यता आवश्यक आहे. त्याअनुषंगाने महाराष्ट्र राज्य निसर्ग पर्यटन विकास मंडळाची स्थापना करणे या बाबीचा समावेश निसर्ग पर्यटन योजना (२४०६ २२९५) या लेखाशिर्षात करण्याबाबत नियोजन विभाग व वित्त विभागाची मान्यता घेण्याची कार्यवाही मंत्रालयीन स्तरावर सुरु आहे.

संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सन २०१५-१६ करिता निसर्ग पर्यटन योजना (२४०६ २२९५) अंतर्गत रु. १२८.८६ लक्षच्या कार्यबाबीस तांत्रिक तथा प्रशासकीय मंजूरी प्राप्त असलेले संरक्षित क्षेत्रांचा पर्यटन आराखडा तयार करुन मान्यतेसाठी सादर केले आहेत.

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सादर केलेल्या रु. ६०८.५० लक्षपैकी वरीलप्रमाणे १२८.७५ लक्ष रुपयांच्या तांत्रिक तथा प्रशासकीय मंजूरी प्राप्त असलेल्या कामांच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. सबब संदर्भ क्रमांक २ च्या प्रस्तावात नमूद केल्याप्रमाणे अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), नाशिक यांना **रु. १२८.७५ लक्षच्या** सोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या प्रशासकीय / तांत्रिक मान्यता प्राप्त असलेल्या कार्यबाबीकरीता निधी खालील अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१५-१६ मध्ये लेखाशिर्ष क्र.२४०६ वनीकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) अंतर्गत उद्दीष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे प्राप्त होणाऱ्या निधीतून सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार खर्च करण्यात यावी.

२) योजनांतर्गत प्रस्तावित कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे, याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबीवर निधी खर्ची टाकण्यात यावा आणि याची जबाबदारी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) यांची राहील.

३) कार्यबाबीमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पद्धतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

४) सदर कामे करताना भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ व वन (संवर्धन) अधिनियम १९८० चा भंग होणार नाही या अटीवर मंजूरी देण्यात येत आहे.

५) केंद्र शासन व राज्य शासनाचे निसर्ग पर्यटन धोरणाशी अनुकूल राहतील अशीच कामे कार्यान्वित करावी.

६) वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व दिनांक १७.०४.२०१५ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७.०४.२०१५ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०३१६२२४४०५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APTE ARVIND SHANKAR

Digitally signed by APTE ARVIND SHANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 918010, postalCode=400032, st=Maharashtra, cn=APTE ARVIND SHANKAR
Date: 2015.08.03 16:30:47 +05'30'

**(अरविंद आपटे)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति :**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपूर.
६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), नाशिक.

**प्रत :**

१) महालेखापाल १ व २ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
२) वित्त विभाग, (व्यय-१०) मंत्रालय, मुंबई- ३२.
३) कक्ष अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई ३२.
४) कक्ष अधिकारी (कार्यासन फ-२), महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई ३२.
५) निवड नस्ती, फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई ३२.

********

**शासन निर्णय क्रमांक डब्ल्यूएलपी ०६१५/प्र.क्र. १७० /फ-१, दिनांक :- ०३ ऑगस्ट, २०१५ सोबतचे विवरणपत्र.**

**(रक्कम रुपये लाखात)**

| प्रधान शिर्ष | सविस्तर शिर्ष | ऑगस्ट, २०१५ | सप्टेंबर, २०१५ | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ४ | ५ | ६ |
| २४०६ २२९५ | ०२-मजुरी | ३०.५० | २०.०० | ५०.५० |
| | २१- पुरवठा व सामग्री | २५.७५ | १३.५० | ३९.२५ |
| | २७-लहान बांधकामे | १०.०० | ९.५० | १९.५० |
| | ५०-इतर खर्च | १०.०० | ९.५० | १९.५० |
| | **एकूण** | **७६.२५** | **५२.५०** | **१२८.७५** |

*****

**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी ०६१५/प्र.क्र.१७०/फ-१, दिनांक :- ०३ ऑगस्ट, २०१५ सोबतचे परिशिष्ट**

**अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), नाशिक यांचेकडील खालीलप्रमाणे एकूण कामे रू. १२८.७५ लक्ष**

**नांदुरमधमेश्वर अभयारण्य**

| अ.क्र. | योजनेतील प्रस्तावित बाबनिहाय कामे | बाबनिहाय अंदाजित रक्कम (लाखात) |
|---|---|---|
| १ | चापडगाव येथे पिण्याची पाण्याची सोय करणे | ४.०० |
| २ | चापडगाव येथे प्रवेशद्वार बांधणे | ४.०० |
| ३ | चापडगाव येथे इको हट्स तयार करणे | १५.०० |
| | **एकूण** | **२३.००** |

**यावल अभयारण्य**

| अ.क्र. | योजनेतील प्रस्तावित बाबनिहाय कामे | बाबनिहाय अंदाजित रक्कम (लाखात) |
|---|---|---|
| १ | कक्ष क्र. ३९ मध्ये पाईप रेलींग करणे | १०.०० |
| २ | कक्ष. क्र. ३९ मध्ये निरीक्षण मनोरे बांधणे | ३.५० |
| ३ | एल.सी.डी. प्रोजेक्टर | १.०० |
| ४ | झेंडाबर्डी येथे पाईप रेलिंग तयार करणे | ६.०० |
| ५ | करंजपाणी येथे निरीक्षण मनोरा उभारणे | ३.०० |
| | **एकूण** | **२३.५०** |

**अनेरडॅम अभयारण्य**

| अ.क्र. | योजनेतील प्रस्तावित बाबनिहाय कामे | बाबनिहाय अंदाजित रक्कम (लाखात) |
|---|---|---|
| १ | हिसाळे येथे पॅगोडा तयार करणे | ३.०० |
| २ | सुळे येथे निरिक्षण मनोरा | ३.५० |
| ३ | महादेव दौदवाडा येथे निसर्ग पाऊलवाट तयार करणे | १.५० |
| | **एकूण** | **८.००** |

**कळसूबाई हरिश्चंद्रगड अभयारण्य**

| अ.क्र. | योजनेतील प्रस्तावित बाबनिहाय कामे | बाबनिहाय अंदाजित रक्कम (लाखात) |
|---|---|---|
| १ | उडदावणे येथे चेनलिंक फेन्सिंग | ७.५० |
| २ | घाटघर येथे सिक्युरिटी कॅबीन | ३.३९ |
| ३ | कुमशेत येथे वॉच टॉवर -१ | ३.५० |
| | **एकूण** | **१४.३९** |

## गौताळा औट्रमघाट अभयारण्य

| अ.क्र. | योजनेतील प्रस्तावित बाबनिहाय कामे | बाबनिहाय अंदाजित रक्कम (लाखात) |
|---|---|---|
| १ | मौ. पुरणवाडी येथील निसर्ग पर्यटन केंद्रासाठी सोलार २ के. वॉट पॉवर पॅक बसविणे | ४.०० |
| २ | मौ. पुरणवाडी निसर्ग निर्वाचन केंद्राचे Display Item वर फोकस लाईट टाकणे | ०.८० |
| ३ | मौ. पुरणवाडी निसर्ग केंद्र लगत पर्यटकांसाठी गार्डन तयार करणे | १.०० |
| ४ | मौ. पुरणवाडी येथे पर्यटकांसाठी बांधण्यात आलेल्या डॉरमेटरी साहित्य / फर्निचर खरेदी करणे | १.०० |
| ५ | मौ. पुरणवाडी येथे व्हयु पॉईंटवर नाल्यावरून जाण्याकरीता फूट ओव्हर ब्रीज बांधणे | ६.८३ |
| ६ | मौ. हिवरखेडा निसर्ग निर्वचन केंद्रासाठी पर्यटकांना व बैठकीसाठी १०० फायबर खुर्च्या व डायस / साऊंड व्यवस्था करणे. | १.५० |
| ७ | मौ. हिवरखेडा येथील निसर्ग निर्वाचन केंद्रातील पुरूष व महिला प्रसाधन गृहाची दुरूस्ती | २.३७ |
| ८ | सुचना फलक लावणे | २.०० |
| ९ | मौ. गौताळा येथे निसर्ग पाऊलवाट | ६.८२ |
| १० | मौ. तपोवन येथील पर्यटक निवासाची दुरूस्ती करणे | १.२७ |
| ११ | मौ. पितळखोरा पर्यटक निवासा करीता चैनलिंक फेन्सींग करणे | २.९० |
| १२ | मौ. पितळखोरा पर्यटक निवासांची दुरूस्ती करणे | २.२१ |
| १३ | पर्यटकांसाठी मौ. गौताळा तलावाचे सुशोभिकरण, घडीव दगडी पाथ तयार करणे दक्षिण बाजू | ३.०० |
| १४ | पर्यटकांसाठी मौ. गौताळा तलावाचे सुशोभिकरण, घडीव दगडी पाथ तयार करणे पश्चिम बाजू | ३.०० |
| १५ | पर्यटकांसाठी मौ. गौताळा तलावाचे सुशोभिकरण, घडीव दगडी पाथ तयार करणे पूर्व बाजू | ३.०० |
| १६ | पर्यटकांसाठी भास्कराचार्य (हत्तीबंगला) विश्रामगृहाची दुरूस्ती व साहित्य खरेदी करणे | ३.१२ |
| १७ | पर्यटकांसाठी लिलावती विश्रामगृहाची दुरूस्ती | १.७३ |
| | **एकूण** | **४६.५५** |

## येडशी रामलिंगघाट अभयारण्य

| अ.क्र. | योजनेतील प्रस्तावित बाबनिहाय कामे | बाबनिहाय अंदाजित रक्कम (लाखात) |
|---|---|---|
| १ | निसर्ग पाऊलवाट तयार करणे | २.१० |
| २ | मौ. येडशी सितान्हाणी जवळ पॅगोडा बांधणे | ३.७५ |
| | **एकूण** | **५.८५** |

## नायगांव मयूर अभयारण्य

| अ.क्र. | योजनेतील प्रस्तावित बाबनिहाय कामे | बाबनिहाय अंदाजित रक्कम (लाखात) |
|---|---|---|
| १ | मौ. नायगांव निरीक्षण कुटी करीता फर्निचर व साहित्य खरेदी करणे, बेड, सोफा, चेअर, वॉटर प्युरिफायर, फ्रिज, डायनिंग टेबल, ड्रेसींग टेबल इ. | २.५० |
| २ | मौ. नायगांव निरीक्षण कुटीकरीता सोलार वॉटरहिटर पाईप लाईन इत्यादी | १.०० |
| ३ | मौ. नायगांव येथील हनुमान मंदीर ते निरीक्षण मनोरा निसर्ग पाऊलवाटेवर उंच शोभिवंत वृक्षाची लागवड करणे drip irrigation पाणी देणे. | १.७० |
| ४ | मौ. डोंगरकिन्ही ते भाटेवाडी तलाव निसर्ग पाऊल वाटेवर उंच शोभिवंत वृक्षांची लागवड करणे drip irrigation पाणी देणे | १.१३ |
| ५ | मौ. नायगांव मदर्सा दर्गा ते हनुमान मंदिर निसर्ग पाऊलवाटेवर उंच शोभिवंत वृक्षाची लागवड करणे drip irrigation | १.१३ |
| | **एकूण** | **७.४६** |

*******